सन २०२०-२१ मध्ये राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या शेतक-यांना नवीन विहीरींचा लाभ देण्याच्या कार्यक्रमास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत......

# महाराष्ट्र शासन

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३५/३अे,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक: २२ सप्टेंबर, २०२०

**वाचा:**

१) कृषि व पदुम विभाग, शासननिर्णयक्रमांकः संकीर्ण-२०१९/प्र.क्र.१३५/३अे,दि. १३.९.२०१९
२) कृषि व पदुम विभाग, शासन पत्र क्र. राकृवि-०१२०/प्र.क्र.१४/१४-अे,दि .२७.३.२०२०
३) संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांचे पत्र क्र. विप्र-७/शा.नि./दि .२७.३.२०२०

**प्रस्तावना:-**

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीमधून अनुसूचित जाती व अनुसूचित जमातीतील शेतकऱ्यांना नवीन विहीरीचा लाभ या प्रकल्पासाठी सन २०१९-२० मध्ये अनुसूचित जाती प्रवर्गासाठी रू. २२.५० कोटी व अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी रू. २२.५० कोटी निधीच्या कार्यक्रमास उपरोक्त संदर्भाधिन दि. १३.९.२०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकिय मान्यता देण्यात आली आहे.त्यानुसार क्षेत्रिय स्तरावर सर्व संबंधितांना मार्गदर्शक सूचना कृषि आयुक्त स्तरावरून निर्गमित करण्यात आलेल्या आहेत.

राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत, **रु.१.५० लक्ष वार्षिक उत्पन्नाच्या मर्यादेत असलेल्या** अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या शेतक-यांना नवीन विहीरींचा लाभ देण्यासंदर्भातील या प्रकल्पासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजनेच्या २८ व्या राज्यस्तरीय प्रकल्प मंजूरी समितीच्या बैठकिमध्ये रू. १०० कोटी अतिरिक्त निधी मंजूर करण्यात आलेला असुन सदर प्रकल्प सन २०२०-२१ अखेर पर्यंत राबविण्यासाठी एकूण प्रकल्पमूल्य रू. १४५.०० कोटी एवढे मंजूर झालेले आहेत.

सदर प्रकल्प सन २०२०-२१ अखेरपर्यंत राबविण्यासाठी रू. ५८.७७ कोटी एवढ्या निधीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती, त्याबाबत शासनाने पुढील निर्णय घेतला आहे -

**शासन निर्णय:**

१. सन २०२०-२१ मध्येराष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या शेतक-यांना नवीन विहीरींचा लाभ देणे हा कार्यक्रम राबविण्यासाठी रु. ५८.७७ कोटी (रू. अठठावण कोटी सत्त्यात्तर लाख) निधीच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कार्यक्रामांतर्गत रु. ५८.७७ कोटी इतका निधी अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गातील शेतकऱ्यांना नवीन विहीरीचा लाभ देण्यासाठी उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. राज्यातील अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गाच्या शेतक-यांना सिंचनाची शाश्वत सुविधा उपलब्ध करुन देण्यासाठी या कार्यक्रमांतर्गत रु. १.५० लाख मर्यादेपर्यंत वार्षिक उत्पन्न असणाऱ्या अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती प्रवर्गाच्या शेतक-यांना नवीन विहीर या बाबींसाठी डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना यायोजनांच्या धर्तीवर उच्चतम अनुदान मर्यादा रु.२.५० लाख प्रति लाभार्थी अनुज्ञेय राहील.

४. सदर कार्यक्रमासाठी लाभार्थी पात्रतेचे निकष व नवीन विहीर या घटकासाठी अंमलबजावणीची पध्दती डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना या योजनांच्या धर्तीवर राहील.

५. सदर कार्यक्रम हा डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना या दोन्ही योजनांच्या अभिसरण (Convergence) पद्धतीने राबविण्यात येईल. सदर कार्यक्रमांतर्गत केवळ नविन विहीर या घटकाचा लाभ द्यावयाचा असल्याने सदर लाभार्थ्यांना नियमित योजनेतील इतर घटकांचा लाभ संबंधीत योजनेतून अनुज्ञेय राहील, जेणेकरून अधिक लाभार्थ्यांना लाभ देणे शक्य होईल. राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत अनुसूचीत जाती व अनुसूचीत जमाती प्रवर्गांसाठी राज्यस्तरीय प्रकल्प मंजूर समितीने मंजूर केलेल्या सदर कार्यक्रमाचा कालावधी एक वर्षाचा आहे. सदर कालावधीत निधी खर्ची पडण्याचे दृष्टीने संबंधित योजनांतर्गत ज्या लाभार्थ्यांनी नवीन विहीर घटकासाठी मागणी केली आहे त्यांना प्रथम प्राधान्याने राष्ट्रीय कृषि विकास योजनेंतर्गत निधीतून लाभ द्यावा. सदर योजनेतील निधी पूर्णत: खर्ची पडल्यानंतर उर्वरीत लाभार्थ्यांना नियमित योजनेतून या घटकाचा लाभ द्यावा.

६.सदर कार्यक्रमांतर्गत कृषि गणनेनुसार जिल्हयानिहाय एकुण अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील शेतकऱ्यांच्या प्रमाणात लक्षांक निश्चीत करण्याची कार्यवाही आयुक्त (कृषि) यांनी करावी. तसेच सदर कार्यक्रमांतर्गत मंजुर करण्यात आलेल्या निधीची विभागणी जिल्हानिहाय निश्चीत करण्यात आलेल्या लक्षांकाच्या प्रमाणात जिल्हास्तरावर आयुक्त (कृषि) यांनी करावी.

७.सदर कार्यक्रमांतर्गत प्राप्त झालेला निधी कृषि आयुक्त कार्यालयाने संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना वितरीत करावा.

८.सदर कार्यक्रमांतर्गत चालू वर्षी मंजूर केलेल्या तरतुदीच्या मर्यादेत जिल्हास्तरावर जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी कृषि विकास अधिकारी यांचे समन्वयाने अंमलबजावणी करावी.

९.सदर कार्यक्रमांतर्गत कृषि गणनेनुसार जिल्हयातील संबंधित तालुक्यातील एकुण अनुसूचित जाती व जमाती प्रवर्गातील शेतकऱ्यांच्या संख्येच्या प्रमाणात प्रत्येक तालुक्यांचा कृषि विकास अधिकारी यांनी आर्थिक लक्षांक निश्चित करावा व सदर लक्षांकाच्या मर्यादेत संबंधित तालुक्यातील डॉ.बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना सन २०२०-२१ साठी पात्र ठरलेल्या इच्छुक शेतकऱ्यांमधून जिल्हास्तरीय निवड समितीने या कार्यक्रमासाठी लाभार्थ्यांची निवड करावी.

१०.प्रत्येक तालुक्यातील लाभार्थ्यांची निवड यादी तसेच, प्रतिक्षा यादी क्रमवारीनुसार प्रसिद्ध करावी. सदर तालुका निहाय याद्यांच्या प्रती पंचायत समिती, जिल्हा परिषद व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयाच्या सूचना फलकावर लावावी तसेच, संकेतस्थळावर प्रसिद्ध करावी.

११.सोडतीद्वारे नवीन विहीर या बाबींसाठी निवडलेल्या लाभार्थ्यांना त्यांची निवड झाल्याबाबत सोडतीनंतर ७ दिवसांत लेखी सूचनेद्वारे कळवावे. तदनंतर लाभार्थ्यांच्या प्रक्षेत्राची स्थळ पाहणी करावी आणि तांत्रिक व्यवहार्यता तपासणीअंती, लाभार्थ्यांचे नवीन विहिर खोदावयाचे ठिकाण तांत्रिकदृष्ट्या योग्य असल्याचे आढळल्यास,सदर बाबींचे अंदाजपत्रक मंजूर करून संबंधित लाभार्थ्यांच्या प्रस्तावांना पूर्वसंमती देण्याची कार्यवाही सोडतीच्या दिनांकापासून ४५ दिवसांच्या आत करावी.त्याचप्रमाणे,स्थळ पाहणीमध्ये ज्या लाभार्थ्यांचे प्रस्ताव तांत्रिकदृष्ट्या अयोग्य आढळतील त्यांची निवड रद्द करावी व प्रतीक्षा यादीतील पात्र असणाऱ्या पुढील लाभार्थ्यांची निवड करण्यात यावी.

१२.सदर कार्यक्रमांतर्गत बाबींची विहित कालावधीत अंमलबजावणी न करणाऱ्या लाभार्थ्यांची पूर्वसंमती रद्द करण्यात यावी व तदनंतर प्रतिक्षा यादीतील क्रमवारीनुसार पात्र असणाऱ्या पुढील लाभार्थ्यांची निवड करावी. अशा प्रकारे सदर योजने अंतर्गत लाभार्थ्यांची पारदर्शक पद्धतीने निवड करून योजनेची अंमलबजावणी करण्यात यावी.

१३.सदर कार्यक्रमाची अंमलबजावणी करण्यासाठी लाभार्थ्यांना कमाल १ वर्षाचा कालावधी अनुज्ञेय राहील.

१४.सदर कार्यक्रमांतर्गत जिल्ह्यास / तालुक्याकरिता प्राप्त होणाऱ्या आर्थिक लक्षांकाच्या मर्यादेतच लाभार्थ्यांना पूर्वसंमती देण्यात यावी.

१५.सदर कार्यक्रमांतर्गत लाभार्थ्यांची निवड डॉ. बाबासाहेब आंबेडकर कृषि स्वावलंबन योजना व बिरसा मुंडा कृषि क्रांती योजना या योजनांतर्गत गठीत करण्यात आलेल्या निवड समितीमार्फतच करण्यात यावी. तालुकानिहाय आर्थिक लक्षांकाच्या मर्यादेत पात्र लाभार्थी न मिळाल्यास, ज्या तालुक्यांमध्ये आर्थिक लक्षांकापेक्षा जादा अर्ज प्राप्त झाले आहेत त्या तालुक्यातील पात्र शेतक-यांमधून समन्यायी पध्दतीने

लाभार्थ्याची निवड करणेबाबतची कार्यवाही जिल्हा निवड समितीने करावी. संबंधित योजनांतर्गत सन २०२०-२१ साठी लाभार्थ्यांची निवड यापूर्वी झाली असल्यास प्रतिक्षा यादीवरील लाभार्थ्यांची देखील लाभार्थ्यांच्या पुर्वसंमतीने या कार्यमक्रमासाठी निवड करता येईल. पात्र लाभार्थ्यांची यादी कृषि विकास अधिकारी यांनी संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांना पाठवावी.

१६.सदर कार्यक्रमांतर्गत अनुज्ञेय अनुदानाची रक्कम संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी यांनी लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यावर इलेक्ट्रॉनिक पद्धतीने वर्ग करावी.

१७. प्रस्तुत शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक १८५/२०२०/व्यय-१ दि. २२/०९/२०२० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

१८.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००९२२१५०११५२४०१ .असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ashok Maroti Atram

Digitally signed by Ashok Maroti Atram
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture And ADF Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd,
serialNumber=5f7eca1f400d866ea34324cea1a547aa04f0da0794a00bee126e8678172a15c5, cn=Ashok Maroti Atram
Date: 2020.09.22 15:04:06 +05'30'

(अशोक आत्राम)
**सहसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई३२-
२. मा.राज्यमंत्री (कृषि),कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. प्रधान सचिव (सामाजिक न्याय व विशेष सहाय्य), मंत्रालय, मुंबई-३२
५. प्रधान सचिव (आदिवासी विकास) ,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य,पुणे.
७. आयुक्त(समाज कल्याण)व आदिवासी विकास विभाग पुणे
८. संचालक (विस्तारवप्रशिक्षण),कृषिआयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे (१० प्रतीसह)
९. संचालक (फ़लोत्पादन ),कृषिआयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.जिल्हाधिकारीवसदस्यसचिव, जिल्हानियोजनविकासमंडळ (सर्व)
११.मुख्यकार्यकारीअधिकारी, जिल्हापरिषद (सर्व)
१२.अतिरिक्तआयुक्त, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग आदिवासी विकास विभाग,
१३.विभागीय कृषि सहसंचालक (सर्व)
१४.सामाजिक न्याय व विशेष सहाय्य उप-आयुक्त(सर्व)
१५.जिल्हापरिषदांचेमुख्यवित्तवलेखाअधिकारी(सर्व)

१६.जिल्हा अधिक्षककृषिअधिकारी(सर्व)
१७.जिल्हा कोषागार अधिकारी(सर्व)
१८. कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१९.महासंचालक ,माहिती व जनसंपर्क सचालनालय,मुंबई.
२०.महालेखापाल महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई /नागपूर
२१.महालेखापाल महाराष्ट्र (लेखापरिक्षा)मुंबई /नागपूर
२२.वित्त विभाग ( कार्यासन -व्यय १/अर्थसंकल्प १३) , मंत्रालय, मुंबई -३२
२३.नियोजनविभाग, मंत्रालयमुंबई- ३२
२४.निवड नस्ती (कार्यासन ३अे)